राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान गट व
पंचायत अभियंता यांची नेमणूक करणे.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः **रागांपं-२०१४/प्र.क्र.१७६/योजना-४**
बांधकाम भवन, २५-मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
तारीख: २९ ऑक्टोबर, २०१४

वाचा

१) शासन निर्णय क्रमांकः क्रमांक:रागांपं-२०१४/प्र.क्र.१४८/योजना-४ दिनांक १ ऑगस्ट,२०१४.

२) सारडा मुरलीधरन, सह सचिव, केंद्रीय पंचायती राज, नवी दिल्ली यांचे अर्ध शासकीय पत्र क्र.एन-१८०११/२/२०१४-डीपीई, दिनांक १ ऑगस्ट,२०१४.

प्रस्तावना

राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान अंतर्गत गट व पंचायत अभियंत्यांची पदे निर्माण केलेली असून प्रत्येक पंचायत समितीस १ गट अभियंता आणि प्रत्येक ५००० पेक्षा जास्त लोकसंख्या असलेल्या ग्राम पंचायतीस १ पंचायत अभियंत्यांचे पद निर्माण करण्यात आले आहे. शासनाच्या दिनांक १ ऑगस्ट, २०१४ च्या शासन निर्णयानुषंगाने सदरील गट व पंचायत अभियंत्यांना महात्मा गांधी महाराष्ट्र रोजगार हमी योजनेअंतर्गत असलेल्या कामावर तांत्रिक नियंत्रण करण्याबाबत निर्देश देण्यात यावेत अशी विनंती पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांच्याकडून करण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने संबंधितांना तसे निर्देश देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन परिपत्रक

राजीव गांधी सशक्तीकरण अभियाना अंतर्गत दिनांक १ ऑगस्ट, २०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रत्येक गट अभियंता आणि पंचायत अभियंत्यांची पदस्थापना करण्यात आलेली आहे. यामध्ये संबंधित

अभियंत्यांची कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या निश्चित केलेल्या आहेत. यामध्ये ग्राम पंचायतीने करावयाच्या स्वनिधीतील कामे केंद्र व राज्य पुरस्कृत योजनांच्या कामासाठी विहीत नियमावली तपासणे, तांत्रिक सल्ला देणे, कामांचे अंदाजपत्रक तयार करणे तसेच सक्षम प्राधिकाऱ्यांची मान्यता घेणे, निविदा प्रक्रिया राबविणे, कामाचे कार्यारंभ आदेश देणे, प्रशासकीय तांत्रिक मान्यतेप्रमाणे काम पूर्ण होईपर्यंत देखरेख करणे आणि कामाच्या मूल्यांकनासह पूर्णत्वाचा दाखला देण्याबाबत जबाबदारी देण्यात आलेली आहे.

२. केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.२ मधील सूचनेनुसार दिनांक १ ऑगस्ट, २०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रत्येक गट अभियंता आणि पंचायत अभियंत्यांना केंद्र पुरस्कृत योजनांतर्गत महात्मा गांधी महाराष्ट्र राज्य ग्रामीण रोजगार हमी योजना, इंदिरा आवास योजना, मागास क्षेत्र अनुदान निधी आणि तत्सम केंद्र पुरस्कृत योजना तसेच राज्य पुरस्कृत योजना आणि पंचायत राज संस्थेच्या निधीतून घेण्यात येणाऱ्या सर्व योजनांची तांत्रिक देखरेख करणे, कामांचे मूल्यांकन करणेबाबत व पूर्णत्वाचा दाखला देण्याची जबाबदारी देण्यात येत आहे.

३. संबंधित गट अभियंता/ पंचायत अभियंता यांनी शासनाच्या प्रचलित धोरणाप्रमाणे संबंधित कामावर तांत्रिक देखरेख ठेवावी तसेच कामाचे मूल्यांकन करुन सक्षम अधिकाऱ्यांकडून विहीत टक्केवारीत तपासणी करुन घेवून कामाचे मूल्यांकन करण्याची जबाबदारीदेखील सोपविण्यात येत आहे. ज्या ग्रामपंचायतींची २०११ च्या जनगणनेनुसार लोकसंख्या ५००० च्या वर आहे, अशा ग्रामपंचायतींना एक पंचायत अभियंता देण्यात आला आहे. अशा पंचायत अभियंत्याकडे त्या संबंधित ग्रामपंचायतीसाठी नियुक्ती केली असली तरीही त्या ग्रामपंचायतीच्या जवळील कांही ग्रामपंचायतींच्या कामासाठी सुध्दा संबंधित पंचायत अभियंत्याकडे कार्यभार सोपविण्याचा निर्णय मुख्य कार्यकारी अधिकारी यांना घेता येईल. असा निर्णय घेताना मूळ ग्रामपंचायतीकडील कामाचा व्याप लक्षात घेऊनच लगतच्या ग्राम पंचायतीच्या कामाचा कार्यभार देण्याचा निर्णय घ्यावा.

४. वरील सूचनांची काटोकोरपणे अंमलबजावणी व्हावी व ग्रामपंचायत स्तरावरील कामावर तांत्रिक देखरेख ठेवून कामाचा दर्जा सुधारण्याची दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०२९१५१०२५९६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagawan Bayaji Mahale

Digitally signed by Bhagawan Bayaji Mahale
DN: CN = Bhagawan Bayaji Mahale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Rural Development Department
Reason: I am approving this document
Date: 2014.10.30 15:04:25 +05'30'

**( भ. ब. महाले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव,
४. मा.मंत्री, मा.राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
५. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,
६. मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व),
७. मा.विधान सभा/ मा.विधान परिषद सदस्य (सर्व),
८. मा.अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (नियोजन, वित्त, ग्राम विकास, जलसंधारण, आदिवासी विकास, सामाजिक न्याय, माहिती व तंत्रज्ञान) यांचे स्वीय सहायक,
९. विभागीय आयुक्त (सर्व)
१०.महा संचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), बाणेर रोड, पुणे,
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व),

१२.राज्य प्रकल्प संचालक, राज्य प्रकल्प व्यवस्थापण कक्ष रा. गां. पं.स. अ. पुणे.

१३.वित्त विभाग (व्यय-१५/अर्थसंकल्प-१७) मंत्रालय, मुंबई-३२,

१४.नियोजन विभाग (का.क्र.१४४४), मंत्रालय, मुंबई-३२,

१५.सह सचिव (वित्त/ग्रा.वि.) मंत्रालय, मुंबई-३२,

१६.उप सचिव (वित्त-१/ग्रा.वि.) मंत्रालय, मुंबई-३२,

१७.सह सचिव/उप सचिव सर्व, ग्राम विकास विभाग,बांधकाम भवन, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई,कार्यासन-वित्त-१,

१८.निवडनस्ती-योजना-४